**कुष्ठरोग निवारणासाठी सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात रुग्णालयीन तत्वावरील ११ स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिका १२२५/प्र.क्र. १६/संसआ - २**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: १६ जून, २०२५.

<u>वाचा :-</u>

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः, कुनिका २०११/प्र.क्र.३२१/ आरोग्य-५, दि. २१ मार्च, २०१२
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः कुनिका १२२४/प्र.क्र.९७/ आरोग्य-५, दि. २२ जानेवारी, २०२५
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७ एप्रिल, २०२५
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे-६, यांचे पत्र क्र. जा.क्र.ससंआसे/कुष्ठवक्षय/अनुदानशाखा/रुग्णालयीन/अनु.मा.प्रस्ताव/न.क्र.९०/६१८६-८८/ २५, दि.२५ एप्रिल, २०२५.

<u>प्रस्तावना :-</u>

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार रुग्णालयीन तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी प्रतिरुग्ण जास्तीत जास्त रु.२,२००/- प्रमाणे अथवा परिरक्षणार्थ खर्चाच्या ८०% यापैकी कमी असेल ती रक्कम या प्रमाणात दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरीता संदर्भ क्र.४ येथील सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे-६, यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०२५-२६ या वित्तिय वर्षातील तरतूदीमधील रु.९४,३९,३८३/- (रूपये चौऱ्याण्णव लाख एकोणचाळीस हजार तीनशे त्र्याऐंशी फक्त) इतके सहायक अनुदान रुग्णालयीन तत्त्वावरील ११ स्वयंसेवी संस्थांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

कुष्ठरुग्णांसाठी रुग्णालयीन तत्त्वावर काम करणाऱ्या ११ स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देण्यासाठी सन २०२५-२६ या वर्षाकरीता लेखाशिर्ष २२१० ०६८३, ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु. ५,००,००,०००/- (रु. पाच कोटी फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सदर अनुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे ११ स्वयंसेवी संस्थांना एकूण रु.९४,३९,३८३/- (रूपये चौऱ्याण्णव लाख एकोणचाळीस हजार तीनशे त्र्याऐंशी फक्त) इतके सहाय्यक अनुदान वितरणास संदर्भाधिन क्र. १

येथील दिनांक २१ मार्च, २०१२ रोजीच्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्वयंसेवी संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | कुष्ठरोग निवारण समिती शांतीवन नेरे, जि.रायगड | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | १३३ | रु.२,६०,८५७/- |
| | | ऑक्टोबर २०२४ ते डिसेंबर २०२४ | ७७ | रु.१,३५,९१७/- |
| २ | अहमदनगर जिल्हा कुष्ठरोग निवारण समिती रुग्णालय कुष्ठधाम सावेडी रोड, अहमदनगर जि.अहमदनगर | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | ६६ | रु.१,४४,६८६/- |
| ३ | रिचर्डसन लेप्रसी हॉस्पीटल मिरज जि.सांगली | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | ४०७ | रु.४,५८,९२५/- |
| ४ | कुष्ठनिवारण दवाखाना, वडोली ता.तलासरी, जि.पालघर | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | २३४ | रु.५,१४,८००/- |
| | | ऑक्टोबर २०२४ ते डिसेंबर २०२४ | १५० | रु.२,५७,४००/- |
| ५ | विदर्भ महारोगी सेवा मंडळ, तपोवन, जि.अमरावती | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | ५१४ | रु.१०,९५,०२७/- |
| | | ऑक्टोबर २०२४ ते डिसेंबर २०२४ | २६९ | रु.५,६९,४९३/- |
| ६ | लेप्रसी मिशन, लेप्रसी हॉस्पीटल कोठारा, ता.अचलपूर, जि.अमरावती | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | ४७० | रु.५,०१,६८६/- |
| | | ऑक्टोबर २०२४ ते डिसेंबर २०२४ | २०४ | रु.२,२१,५८६/- |
| ७ | लेप्रसी रिहॅबिलिटेशन सेंटर, निंभोरा जि. अमरावती | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | ७८ | रु.१,५४,३७६/- |
| | | ऑक्टोबर २०२४ ते डिसेंबर २०२४ | ५२ | रु.६४,२१३/- |
| ८ | महारोगी सेवा समिती | जानेवारी २०२४ ते मार्च २०२४ (उर्वरित रक्कम) | २५ | रु.५१,९८८/- |

| अ.क्र. | स्वयंसेवी संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान (रु.) |
|---|---|---|---|---|
| | दत्तपूर, वर्धा | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | २४९ | रु.५,३३,१६९/- |
| | | ऑक्टोबर २०२४ ते डिसेंबर २०२४ | ११८ | रु.२,४८,७४९/- |
| ९ | महारोगी सेवा समिती आनंदवन, वरोरा जि.चंद्रपूर | ऑक्टोबर २०२४ ते डिसेंबर २०२४ | १८०० | रु.३९,६०,०००/- |
| १० | महात्मा गांधी शिक्षण संस्था चावर्दा, ता. मोताळा, जि.बुलढाणा | जानेवारी २०२४ ते जून २०२४ | ९० | रु.१,९८,०००/- |
| ११ | एडयुलजी प्रेमजी हॉस्पीटल (बीएलपी), मुंबई | एप्रिल २०२४ ते सप्टेंबर २०२४ | ३१ | रु. ६८,५११/- |
| | | एकूण | ४९६७ | रु.९४,३९,३८३/- |

२. सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात कुष्ठरुग्णांसाठी रुग्णालयीन तत्त्वावर ११ स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरणाचा प्रस्ताव सादर करताना संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या, दि.०७ एप्रिल, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकासोबतच्या मुद्दा क्र.९ मधील तपासणी सूचीनूसार क्र.१ ते १० मधील सर्व अटींची पूर्तता केली असल्याचे प्रमाणपत्र सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) यांनी सादर केले आहे. तसेच, संबंधित संस्थांना यापुर्वी वितरीत केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे देखील प्रस्तावासोबत सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) यांनी सादर केली आहेत.

३. सहसंचालक (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले असून, त्यांनी वरील अटी पुर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित सहायक अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी. तसेच, सदर अनुदानाशी संबंधित देयके संबंधित जिल्हयाच्या अधिदान व लेखा अधिकारी अथवा कोषागार अधिकारी यांच्याकडे सादर करण्यासाठी सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये व खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे. त्याचप्रमाणे, कुष्ठरुग्णांसाठी रुग्णालयीन तत्वावर काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांचे अनुदान वितरीत करण्याचे प्रयोजन विचारात घेता, सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष २२१० ०६८३, ३१-सहायक अनुदाने(वेतनेतर)

अंतर्गत रु. ९४,३९,३८३/- इतका निधी प्रचलित नियम व विहित कार्यपध्दतीने खर्च करण्यात येईल या अटीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

४. याबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, प्रधानशिर्ष २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, उपशिर्ष (०१) (१२) कुष्ठरोग्यांसाठी सहायक अनुदाने, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१० ०६८३) मुळ अनुदान या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू वित्तीय वर्ष २०२५-२६ च्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान हे सशर्त असून, उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर आदेश ई-ऑफीस नस्ती क्र. ९१८१९८ या नस्तीवर नियोजन विभागाच्या दि.२३.०५.२०२५ व वित्त विभागाच्या दि.०२.०६.२०२५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक २०२५०६१६१६०८२३७४१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH GURULING HANSHETTI

Digitally signed by MAHESH GURULING HANSHETTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d541c6ddf0221a38b5bf17bde071c16e4fc5d59c6c056a12206b90f86b0b039, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B2EDCC53DBB4AA0ABD5E56CEB34FAF620B051435FE8057488BAB1D4B20721FD1, cn=MAHESH GURULING HANSHETTI
Date: 2025.06.16 16:30:18 +05'30'

(महेश हंशेट्टी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखावअनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.

२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, आरोग्य भवन मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई/पुणे.

७) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे.

८) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

९) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय.१३) मंत्रालय, मुंबई.

१०) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, (का-१४७२) मंत्रालय, मुंबई.

१०) अवर सचिव, (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती (आरोग्य-५)